भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय,
नागपूर यांच्या आस्थापनेवरील सहायक प्रशासन अधिकारी, (गट-ब) या संवर्गातील उमेदवारांच्या नियुक्तीबाबत...

# महाराष्ट्र शासन
## उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग
## शासन निर्णय क्रमांकः एमएनए-०७२१/प्र.क्र.६८/उ-९

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १५ मार्च २०२४

**संदर्भ:** १) महाराष्ट्र लोकसेवा आयोग गोपनीय पत्र क्र. आयएलआर २१२१/ प्र.क्र.९०/२०२१/अठ्ठावीस, दि.२९ नोव्हेंबर, २०२३.
२) महाराष्ट्र लोकसेवा आयोग, जाहिरात क्र.०८५/२०२२, दि.२१.०९.२०२२
३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग पत्रक्र.०७२१/प्र.क्र.६८/उद्योग -९, दिनांक-५ ऑक्टोबर, २०२१

**प्रस्तावना :-**

भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर यांच्या आस्थापनेवरील सहायक प्रशासन अधिकारी, गट-ब या पदासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत घेण्यात आलेल्या परीक्षेचा अंतिम निकाल प्रसिध्द करुन प्रस्तूत संवर्गाच्या एकूण ०२ पदावर नियुक्तीसाठी ०२ उमेदवारांची शासनास शिफारस केली आहे. महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत शिफारसपात्र उमेदवारांची कागदपत्रे / प्रमाणपत्रांची पडताळणी आयोगाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार व विहित तरतूदीनुसार संबंधित कार्यालयाकडून तपासणी करण्याच्या अधीन राहून सदर नियुक्ती आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भाधिन क्र. १ येथील शिफारस पत्रान्वये खालील तक्त्यात नमूद केलेल्या उमेदवारांची संदर्भाधीन क्र. ३ येथील मागणीपत्रानुसार भूविज्ञान व खनिकर्म संचालनालयाच्या आस्थापनेवरील रिक्त असलेल्या पदांवर गुणवत्तेनुसार तसेच प्रवर्गानुसार नियुक्तीसाठी शिफारस केली आहे. सहायक प्रशासन अधिकारी (गट-ब) या पदावर रूजू होणाऱ्या उमेदवांरास सातव्या वेतन आयोगानुसार एस-१५:४१,८००-१,३२,३०० या वेतनश्रेणीत आणि नियमानुसार प्राप्त होणारे महागाई भत्ता व इतर भत्ते देय राहतील.

| अ.क्र. | म.लो.आ शिफारस क्रमांक | उमेदवाराचे नांव | मूळ प्रवर्ग | म.लो.आ शिफारस प्रवर्ग | पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|---|
| १ | १ | श्री. आव्हाड श्रीकांत चंद्रभान | NT-D | OPEN-General-१ | प्रादेशिक कार्यालय, चंद्रपूर |
| २ | २ | श्री.राठोड विशाल पंढरीनाथ | DT-A | DT-A -General-१ | प्रादेशिक कार्यालय, कोल्हापूर |

उपरोक्त तक्त्यात नमुद उमेदवारांची पुढील अटी / शर्तीच्या अधिन राहून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात नियुक्ती करण्यात येत आहे.

३. उपरोक्त सर्व उमेदवारांनी सदर आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसाच्या आत पदस्थापनेच्या ठिकाणी रुजु होऊन अस्थायी नियुक्तीचा स्वीकार करणे आवश्यक आहे. काही अपरिहार्य कारणास्तव त्यांना रुजू होण्यास मुदतवाढ हवी असल्यास तसे सकारण लेखी कळवून नियमानुसार मुदतवाढ घेणे आवश्यक आहे. अन्यथा ते सदर पदावर रुजू होण्यास इच्छुक नसल्याचे गृहित धरून त्यांची नियुक्ती रद्द करण्याबाबत आवश्यक ती कार्यवाही करण्यात येईल, याची नोंद घ्यावी. पदस्थापनेच्या कार्यालयात रुजू अहवाल आवश्यक त्या कागदपत्रांसह सादर करावा व त्याची एक प्रत महासंचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर यांना सादर करावी.

४. मागासवर्गीय प्रवर्गातील उमेदवारांच्याबाबत जात वैधता प्रमाणपत्र सादर करण्यासाठी व जात प्रमाणपत्र अवैध ठरल्यास अनुसरावयाच्या कार्यपद्धतीबाबत सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. बीसीसी- २०१२/प्र.क्र.३३२/१२/१६-ब, दि. १८.०५.२०१३ मध्ये नमूद सूचनांनुसार नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी कार्यवाही करणे अपेक्षित असून, मागासवर्गीयांसाठी राखीव असलेल्या पदावरील नियुक्तीसाठी शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांबाबत सामान्य प्रशासन शासन निर्णय क्र.बीसीसो-२०११/प्र.क्र.१०६४/२०१२/१६-ब, दि.१२.१२.२०११ मधील तरतूदीनुसार जात वैधता प्रमाणपत्राची वैधता तपासण्याच्या अधीन राहून तात्पुरत्या स्वरुपात नियुक्ती करण्यात येत आहे. ज्या उमेदवाराने जात पडताळणी समितीकडून प्राप्त करून घेतलेले जात वैधता प्रमाणपत्र कागदपत्र पडताळणी दरम्यान सादर केले नसल्यास त्याने जात प्रमाणपत्र पडताळणीसाठी आवश्यक असलेली सर्व कागदपत्रे / प्रमाणपत्रे महासंचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय यांना तात्काळ उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे.

५. महासंचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय यांनी विनाविलंब सदर कागदपत्रे संबंधित विभागीय जात प्रमाणपत्र वैधता पडताळणी समितीकडे पाठवावीत. याशिवाय संबंधित उमेदवाराने देखील स्वतंत्रपणे जात पडताळणी समितीकडे त्याच्याकडे असलेली कागदपत्रे / पुरावे सादर करून पाठपुरावा करावा. याप्रमाणे नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून सहा महिन्याच्या आत जात पडताळणी समितीकडून जात वैधता प्रमाणपत्र प्राप्त करून घेण्याची जबाबदारी संबंधित उमेदवाराची राहील. अन्यथा यासंबंधित असलेल्या शासन निर्णयानुसार उमेदवारावर कार्यवाही करण्यात येईल. तसेच, शिफारस करण्यात आलेल्या सर्व उमेदवारांचे जाती दावे (जात प्रमाणपत्र व जात वैधता प्रमाणपत्र) संचालक, समाजकल्याण संचालनालय, पुणे यांच्याकडून व जमातीचे दावे (जात प्रमाणपत्र व जात वैधता प्रमाणपत्र आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांच्याकडून निर्गमित करण्यात आल्याची खातरजमा करुन घेण्याची कार्यवाही महासंचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय यांनी करावी व तसा अहवाल शासनास सादर करावा.

६. सहायक प्रशासन अधिकारी (गट-ब) या पदावर नामनिर्देशनाने नियुक्त होणाऱ्या उमेदवाराकडे सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक प्रशिक्षण २०००/प्र.क्र.२/२००१/३९. दि १९.०३.२००३ मधील तरतुदीनुसार (अ) D.O.EA.C.C. सोसायटीच्या अधिकृत CCC. किंवा स्तर किंवा B किंवा [C] स्तर पैकी कोणतीही एक परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र किंवा (ब) महाराष्ट्र राज्य उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांचेकडील अधिकृत MS-CIT परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र यापैकी एक प्रमाणपत्र किंवा माहिती तंत्रज्ञान (सा.प्र.वि.) विभागाच्या शासन निर्णय क्र. मातंस २०१२/प्र.क्र.२७७/३९. दि.०४.०२.२०१३ व शासन पुरक पत्र क्र.मालसं २०१२/

प्र.क्र.२७०/३९. दिनांक ०८.०१.२०१८ मध्ये नमूद केल्यानुसार आवश्यक संगणक अर्हता आवश्यक आहे. तथापि, नियुक्ती स्विकारण्याच्या वेळेस सदर प्रमाणपत्र / अहंता उमेदवारांकडे नसल्यास **नियुक्ती स्विकारल्यापासून दोन वर्षांच्या आत उमेदवाराने उपरोक्त शासन निर्णयातील नमूद संस्थेचे संगणक ज्ञानाच्या अर्हतेचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील. या विहित कालावधीत उमेदवाराने सदर प्रमाणपत्र सादर न केल्यास शासन अधिसूचना क्र.एसआरव्ही-२०१७/ प्र.क्र.४६२/ कार्या. १२, दिनांक २८.०५.२०१८ मधील तरतुदीनुसार कार्यवाही करण्यात येईल.**

७. उपरोक्तप्रमाणे नियुक्ती देण्यात आलेल्या उमेदवारांनी सदर संवर्गाच्या सेवाप्रवेश नियमानुसार विभागामार्फत आयोजीत केल्या जाणाऱ्या विभागीय परीक्षा, मराठी व हिंदी भाषा परीक्षा विहित मुदतीत उत्तीर्ण / सूट होणे आवश्यक राहील.

८. सहायक प्रशासन अधिकारी (गट-ब) या पदावर रूजू झालेल्या उमेदवारांकडून साक्षांकन नमुने प्राप्त करून घेतल्यानंतर उमेदवारांच्या पूर्व-चारित्र्याची पडताळणी सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.चापअ १००८/प्र.क्र.२१४/०८/१६-अ, दि.०९.०१.२००९ मधील तरतुदी विचारात घेऊन महासंचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय यांनी पोलीस विभागाकडून करुन घ्यावी व अहवाल प्रतिकुल असल्यास प्रस्तुत शासन निर्णयातील सुचनांनुसार संबंधित उमेदवारांच्या बाबत तातडीने कार्यवाहीकरिता सदर अहवाल शासनास सादर करावा. **"प्रस्तुत उमेदवारांची नियुक्ती त्यांच्या पूर्व-चारित्र्याची पडताळणी करण्यापूर्वी करण्यात येणार असल्यामुळे त्यांची नियुक्ती पुढील आदेश होईपर्यंत करण्यात आली आहे व सेवासमाप्ती पूर्वसूचना न देता करण्यात येईल".** उमेदवारांच्या चारित्र्य पडताळणी संदर्भात साप्रवि परिपत्रक क्र. साप्रअ १०१२/प्र.क्र.६३/१६-अ, दि. २६.८.२०१४ मधील सुचना देखील विचारात घेण्यात याव्यात. सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णयानुसार उमेदवाराची वैद्यकीय तपासणी करण्यात यावी. त्याची नोंद सेवापुस्तकामध्ये घेऊन प्रती जोडण्यात याव्यात व याबाबतचा अहवाल प्रतीसह शासनास सादर करावा.

९. उपरोक्त उमेदवरांपपैकी जे उमेदवार त्यांच्या सेवेचा राजीनामा देऊ इच्छित असतील त्यांनी सामान्य प्रशासन विभाग शासन परिपत्रक दि.२.१२.१९९७ मधील तरतूदीनुसार शासनास किमान १ महिन्याची आगाऊ नोटीस देणे आवश्यक राहील. तसेच ज्या उमेदवारांची सेवा समाप्त करावयाची असेल, त्यावेळी संचालनालयाकडूनही अशी एक महिन्याची आगाऊ नोटीस संबंधित उमेदवारास/ कर्मचाऱ्यास दिली जाईल. मात्र गैरशिस्त, सेवा नियमांचा भंग इ. कारणांसाठी सेवा समाप्त करताना उमेदवारास/ कर्मचाऱ्यास नोटीस देण्याचे भूविज्ञान व खनिकर्म संचालनालयावर बंधनकारक राहणार नाही. सदर नोटीस बाबतचे नियम यानंतर वेळोवेळी होणाऱ्या नियमातील बदलाच्या अधीन राहतील.

१०. उपरोक्त उमेदवार ज्या कार्यालयात नियुक्त होतील, त्या कार्यालयाने सदर उमेदवाराचा रुजू अहवाल घेऊन त्याची प्रत संचालनालयास सादर करावी. तसेच, उमेदवारांचा नियुक्ती आदेश, रुजू अहवाल, प्रमाणपत्रांच्या प्रतीची सेवापुस्तकामध्ये नोंद घेण्यात यावी व सदर कागदपत्रांच्या प्रती सेवापुस्तकामध्ये जोडण्यात याव्यात. उमेदवाराची वैद्यकीय तपासणी व चारित्र्य पडताळणी करून घेऊन त्याची नोंद सेवापुस्तकामध्ये घेऊन प्रती जोडण्यात याव्यात याबाबतचा अहवाल प्रतीसह संचालनालयास सादर करावा.

११. सामान्य प्रशासन विभाग शासन परिपत्रक क्र. टीआरएन-२०१४/३४२/प्र.क्र.५०/२४/२२-अ, दि. २७.५.२०१४ व सामान्य प्रशासन विभाग शासन परिपत्रक क्र. अप-१२१४/प्र.क्र.६५/२४-ब, दि. १३.५,२०१५ नुसार सर्व संवर्गातील अधिकारी/ कर्मचाऱ्यांना राज्य प्रशिक्षण धोरणानुसार (पायाभूत)

प्रशिक्षण अनिवार्य आहे. त्यानुसार प्रशिक्षणासाठी नामनिर्देशित करण्यात आलेले अधिकारी/ कर्मचारी यांनी प्रशिक्षणासाठी सक्तीने उपस्थित राहणे गरजेचे असून, प्रशिक्षणासाठी नामनिर्देशित करण्यात आलेले अधिकारी/ कर्मचारी यांना संबंधित विभागप्रमुख यांनी कार्यमुक्त करणे देखील सक्तीचे आहे.

१२. **उमेदवारांची अस्थायी नियुक्ती शासनाच्या संदर्भ क्र. ३ येथील पत्राच्या निर्देशानुसार कागदपत्र / प्रमाणपत्र पडताळणीच्या अधीन राहून करण्यात येत आहे**. तसेच, कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त न केल्यास किंवा विहित परीक्षा उत्तीर्ण न केल्यास अथवा त्यांची वर्तणूक अयोग्य / संशयास्पद आढळल्यास तो/ ती कोणतीही पूर्व सुचना न देता सेवेतून कमी करण्यास पात्र ठरेल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०३१५१६४३११५२१० असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

LAXMIKANT GOPALRAO DHOKE

Digitally signed by LAXMIKANT GOPALRAO DHOKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=413beeca50b65438c7a037917ccf1f24d8ca684b6564 0df6372ea731ffac4dfc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E714BBCD4D43C6782884C7E7A2091F9F1EDC1 D97EBB542C48B98FB8C8BDD6CF4, cn=LAXMIKANT GOPALRAO DHOKE
Date: 2024.03.15 16:52:33 +05'30'

**(लक्ष्मीकांत ढोके)**
**सह सचिव , महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सर्व संबंधीत उमेदवार (ई-मेलव्दारे)
२. महासंचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर
३. सर्व उपसंचालक, प्रादेशिक कार्यालय, नागपूर/ चंद्रपूर/औरंगाबाद/ कोल्हापूर

**प्रत ,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.उपमुख्यमंत्री (विधी व गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.अपर मुख्य सचिव (खनिकर्म) उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई
५. सहसचिव (खनिकर्म) उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई
६. निवडनस्ती कार्यासन उद्योग-९